**दिनांक १९.११.२०१४ ते दि.२५.११.२०१४ हा सप्ताह "कौमी एकता सप्ताह" म्हणून साजरा करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**अल्पसंख्याक विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः कौएस-२०१४/प्र.क्र.१३५/का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ३२

तारीख: ११.११.२०१४

**शासन परिपत्रक -**

केंद्र शासनाने सन १९८६ मध्ये घेतलेल्या निर्णयानुसार दि.१९ नोव्हेंबर ते दि.२५ नोव्हेंबर हा सप्ताह दरवर्षी कौमी एकता सप्ताह म्हणून राज्यात साजरा करावयाचा असून त्यामध्ये आयोजित करावयाच्या पुढील कार्यक्रमात जास्तीत जास्त लोकांना सहभागी करुन घ्यावयाचे आहे. त्यानुसार यावर्षी बुधवार दि.१९.११.२०१४ ते मंगळवार दि.२५.११.२०१४ हा कालावधी कौमी एकता सप्ताह म्हणून पाळण्यात यावा व त्यातील जास्तीत जास्त लोकांना सहभागी करुन घेऊन खालीलप्रमाणे कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत.

१) बुधवार **दिनांक १९ नोव्हेंबर, २०१४ - राष्ट्रीय एकात्मता दिवस** : धर्मनिरपेक्षता, जातीयवादी विरोध व अहिंसा यांच्यावर भर देणारे सभा, चर्चासत्रे व परिसंवाद आयोजित करावेत.

२) गुरुवार **दिनांक २० नोव्हेंबर, २०१४ - अल्पसंख्यांक कल्याण दिवस** : अल्पसंख्याकांच्या कल्याणासाठी १५ कलमी कार्यक्रमावर भर देण्यात यावा, जातीय दंगली उद्भवणाऱ्या शहरातून बंधुभाव निर्मितीसाठी खास मिरवणूका काढण्यात याव्यात.

३) शुक्रवार **दिनांक २१ नोव्हेंबर, २०१४ - भाषिक सुसंवाद दिवस** : भारताच्या अन्य भागातील लोकांच्या भाषेचा वारसाचा परिचय करुन देण्याच्या दृष्टीने विशेष वाडमयीन कार्यक्रम व कवी संमेलने आयोजित करण्यात यावीत.

४) शनिवार **दिनांक २२ नोव्हेंबर, २०१४ - दुर्बल घटक दिवस** : २० कलमी कार्यक्रमाअंतर्गत अनुसूचित जाती व जमाती मधील व्यक्ती व कमकुवत घटकातील व्यक्ती यांना मदत करण्यासाठी ठरवून दिलेले

कार्यक्रम ठळकपणे निदर्शनास आणण्याच्या दृष्टीने सभा व मेळावे भरविण्यात यावेत. त्यावेळी खालील गोष्टींवर भर देण्यात यावा.

अ) इंदिरा आवास योजना व घरासाठी जागांचे वाटप व कर्जाचे वाटप.

ब) अतिरिक्त जमिनीचे भूमिहीन मजुरांना वाटप.

क) गरीबांना कायदेविषयक सहाय्य देण्याचे कार्यक्रमही आयोजित करण्यात यावेत.

५) रविवार **दिनांक २३ नोव्हेंबर, २०१४ – सांस्कृतिक एकता दिवस** : भारतीयांच्या विविधतेतील एकतेवर भर देणारे आणि सांस्कृतिक संरक्षण व एकात्मता संबंधाची भारतीय परंपरा सादर करणारे सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत.

६) सोमवार **दिनांक २४ नोव्हेंबर, २०१४ – महिला दिन** : भारतीय समाजातील महिलांचे महत्व व राष्ट्र उभारणीच्या विकासामधील त्यांची भूमिका यावर भर देण्यात यावा.

७) मंगळवार **दिनांक २५ नोव्हेंबर, २०१४ – जोपासना दिवस** : पर्यावरणाची जोपासना व त्याची जाणीव यासाठीच्या वाढत्या गरजेवर भर देणारे मेळावे व कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत.

२. वरीलप्रमाणे कार्यक्रमाची रुपरेखा लक्षात घेऊन माध्यमांचा उपयोग करावा.

१) ध्वजारोहण

२) मिरवणूका व सभा

३) राष्ट्रीय एकतेची शपथ

४) चर्चासंमेलने

५) चित्रपट दाखविणे व प्रदर्शने

**यावर्षी दिनांक १९ नोव्हेंबर, २०१४ रोजी राष्ट्रीय एकात्मतेची शपथ घ्यावयाची आहे**. या शपथेचा नमुना सोबत जोडला आहे. राज्यातील सर्व केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या कार्यालयातून ही शपथ घेण्याचा कार्यक्रम राबविण्यात यावा. तसचे भित्तीपत्रके, फलक यांच्यावर ठसठशीत असे राष्ट्रीय एकात्मतेचे प्रतिकचिन्ह प्रदर्शित करावे.

३. शैक्षणिक संस्थांच्या बाबतीत त्यांनी दिनांक १९ नोव्हेंबर, २०१४ ते दिनांक २५ नोव्हेंबर, २०१४ दरम्यान एक सभा शक्यतो सकाळी प्रार्थनेच्या तासानंतर आयोजित करावी. सभेच्या अध्यक्षस्थानी संस्थेच्या सोयीप्रमाणे प्राचार्य किंवा विशेष निमंत्रित असावेत. त्यांनी विद्यार्थ्यांना राष्ट्रीय एकात्मता व ऐक्यभाव यासंबंधी विद्यार्थ्यांना समजेल अशा स्वरुपात विवेचने करावीत. **दिनांक १९ नोव्हेंबर, २०१४ रोजी त्यांनी विद्यार्थ्यांना राष्ट्रीय एकात्मतेची शपथ घ्यावी.** कार्यक्रमाची सांगता समूह राष्ट्रगीताने करावी. शैक्षणिक संस्थांनी दिनांक १९ नोव्हेंबर, २०१४ ते दिनांक २५ नोव्हेंबर, २०१४ या सप्ताहात राष्ट्रीय एकात्मतेची विविध पैलू ठळकपणे निदर्शनास आणण्यासाठी एखादा सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करणे अपेक्षित आहे.

४. स्वयंसेवी संस्थांनी करावयाच्या कार्यक्रम त्यांच्या सोयीने करण्याची त्यांना मोकळीक आहे. मात्र खालीलपैकी एक तरी कार्यक्रम त्यांनी राष्ट्रीय एकात्मता सप्ताहात ठेवावे.

१) राष्ट्रीय एकात्मतेवर प्रख्यात पुढाऱ्यांची भाषणे.

२) राष्ट्रीय एकात्मतेची शपथ सामूहिकरित्या घेणे.

३) सांस्कृतिक कार्यक्रम करणे.

४) राष्ट्रगीताचे सामूहिक गायन.

५. शासकीय कार्यालये व शासन अंगीकृत संस्था यांच्याबाबतीत दि.१९ नोव्हेंबर, २०१४ रोजी विभागप्रमुखानी सभा आयोजित करावी. सभेच्या अध्यक्षस्थानी महत्वाच्या सामाजिक व्यक्ती असाव्यात. भाषणानंतर कर्मचाऱ्यांना राष्ट्रीय एकात्मतेची एकत्रित शपथ देण्यात यावी व कार्यक्रमाच्या शेवटी सामूहिक राष्ट्रगीत ठेवावे.

६. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने निरनिराळया प्रसिध्दी माध्यमाव्दारे या कार्यक्रमांस प्रसिध्दी देण्यात यावी. तसेच राष्ट्रीय एकात्मतेचे संदेश देणारे चित्रपट दाखविले जातील असे पहावे.

७. महिला व बालविकास विभाग तसेच सांस्कृतिक कार्य विभाग यांनी विविध ठिकाणी उचित कार्यक्रम आयोजित करुन पार पाडावेत.

८. सर्व विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी आपआपल्या कार्यक्षेत्रात सर्व संबंधितांची मदत घेऊन हा कार्यक्रम वरीलप्रमाणे त्यांच्या विविध माध्यमातून आखला जाईल व यशस्वी केला जाईल असे पहावे. तसेच केलेल्या कार्यक्रमाचा अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

९. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११२१५५४११६८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2014.11.12 16:03:22 +05'30'

**( समीर साळुंखे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव,

२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

३. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

४. मा.मुख्य सचिव, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग

६. सर्व विभागीय आयुक्त

७. सर्व जिल्हाधिकारी

८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य

१०. पोलिस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य

११. सर्व पोलिस आयुक्त

१२. सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक

१३. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग, मुंबई.

१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई

१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)

१६. कक्ष अधिकारी, सा.प्र.वि./२९, (मंत्रालयात कार्यक्रम आयोजित करण्याच्या आवश्यक त्या कार्यवाहीसाठी)

१७. कक्ष अधिकारी, माहिती व तंत्रज्ञान कक्ष, मंत्रालय, मुंबई (२ प्रती संकेतस्थळावर प्रसिध्दीसाठी)

१८. अल्पसंख्यांक विकास विभागामधील सर्व कार्यासने.

१९. निवड नस्ती (का.८)

## राष्ट्रीय एकात्मता प्रतिज्ञा

"मै सत्यनिष्ठा से प्रतिज्ञा करता हुं की देश आझादी तथा एकता बनाये रखने और उसे मजबूत रखने के लिए समर्पित होकर कार्य करुंगा"

"मै यह भी प्रतिज्ञा करता हॅू की कभी हिंसा का सहारा नही लूंगा तथा धर्म, भाषा, क्षेत्र से संबंधित भेदभाव और झगडो और अन्य राजनैतिक या आर्थिक शिकायतो का निपटारा शांतीपूर्ण तथा संवैधानिक तरीकों से करने के लिए प्रयास करता रहूंगा"

## National Integration Pledge

"I solemnly pledge to work with dedication to preserve and strengthen the freedom and integrity of the nation."

"I further affirm that I shall never resort to violence and that I will continue to endeavor towards settlement of all difference and disputes relating to religion, language, region or other political or economic grievances by peaceful and constitutional means."

## राष्ट्रीय एकात्मता शपथ

"मी गांभीर्यपुर्वक शपथ घेतो / घेते की, देशाचे स्वातंत्र्य आणि राष्ट्रीय एकात्मता अबाधित राखण्यासाठी व दृढ करण्यासाठी मी निष्ठापूर्वक काम करीन.

मी अशीही प्रतिज्ञा करतो / करते की, मी कधीही हिंसाचाराचा अवलंब करणार नाही. तसेच मी सर्व धार्मिक, भाषिक किंवा प्रादेशिक मतभेद व तंटे किंवा इतर राजकीय वा आर्थिक गाऱ्हाणी शांततामय आणि सांविधानिक मार्गाने सोडविण्याचा प्रयत्न चालू ठेवीन."